## ३५ लेखकांना राज्य वाङमय पुरस्कार

०१. प्रख्यात लेखिका, कवयित्री डॉ. प्रभा गणोरकर, नाट्यलेखक प्रेमानंद गज्वी, लेखिका प्रतिमा इंगोले, रमेश पतंगे, पॉप्युलर प्रकाशनचे रामदास भटकळ, लघुकथा लेखक प्रकाश बाळ जोशी, राजीव तांबे यांच्यासह ३५ लेखक, साहित्यकांना महाराष्ट्र शासनाचा २०१५ या वर्षाचा यशवंतराव चव्हाण राज्य वाङमय पुरस्कार जाहीर करण्यात आला आहे.

०२. या पुरस्काराचे स्वरूप जास्तीत जास्त १ लाख रूपये रोख आणि किमान ५० हजार रूपये रोख, स्मृतिचिन्ह आणि प्रमाणपत्र असे आहे. यंदा एकूण २४ लेखकांना १ लाख रूपये रोख रकमेचे तर ८ लेखकांना ५० हजार रूपये रोख पुरस्कार जाहीर करण्यात आले आहेत.

## जीवाश्मीभूत शैवालाचा बॅटरीतील ॲनोडसाठी वापर

०१. डायटमस या एकपेशीय शैवालीच्या जीवाश्मीभूत अवशेषांपासून बनवलेल्या ॲनोडचा वापर केलेल्या सिलिकॉनच्या मदतीने विद्युत वाहनांना वीज पुरवठा करणाऱ्या किफायतशीर लिथियम आयन बॅटरी वैज्ञानिक विकसित करीत आहेत.

०२. रिव्हरसाईड येथील कॅलिफोर्निया विद्यापीठात याबाबत संशोधन झाले असून याच्या आधारे विद्युत वाहने व पोर्टेबल इलेक्ट्रॉनिक साधनात वापरता येणाऱ्या लिथियम आयन बॅटरी किफायतशीर दरात तयार करता येणार आहेत.

०३. लिथियम आयन बॅटरीज या रिचार्जेबल बॅटरीजमध्ये सर्वात लोकप्रिय आहेत त्यात ॲनोड, कॅथोड व इलेक्ट्रोलाईट असे घटक असतात. ते लिथियम क्षार सेंद्रिय द्रावणात विरघळवून तयार केले जातात. ग्राफाईट हा ॲनोडसाठी चांगला पर्याय आहे पण त्याच्या काही मर्यादांमुळे वापर अवघड आहे.

०४. पर्यायी सिलिकॉन दहा पट ऊर्जा साठवू शकतो पण त्याची काबरेथर्मिक पद्धतीने निर्मिती महागात पडते. त्यामुळे डायटोमॅशियस अर्थ या शैवालाच्या जीवाश्माचा वापर यात करता येईल असे वैज्ञानिकांचे मत असून त्याची उपलब्धताही भरपूर आहे, खडकांमध्ये तो सापडत.

०५. गेली काही लाख वर्षे तो जीवाश्म स्वरूपातील अवशेषात आहे. मॅग्नेशियोथर्मिक रिडक्शन पद्धतीने सिलिकॉन डायॉक्साईडच्या या स्रोताचे सिलिकॉन नॅनो कणात रूपांतर करण्यात आले.

## राज्यात जमीन मूल्यांकन योजना

०१. महाराष्ट्राच्या विकासाला चालना मिळावी यासाठी हाती घेतलेल्या महत्त्वाकांक्षी योजनांच्या उभारणीसाठी जमीन मूल्यांकन योजना सरकारने तयार केली आहे.

०२. राज्यात सरकारी मालकीच्या जमिनींचे मूल्यांकन करीत त्या किमतीच्या आधारे सुमारे ५० हजार कोटी रुपयांचा निधी उभारण्याचा विश्‍वास मुख्यमंत्री देवेंद्र फडणवीस यांनी व्यक्त केला आहे.

०३. 'एफएसआय', "टीडीआर" तसेच कमाल जमीन धारणा कायद्यांतर्गत जमिनीची वर्गवारी केली जाणार आहे.

०४. मुंबईतील वांद्रे परिसरात या योजनेची पहिल्यांदा अंमलबजावणी केली जाईल. वांद्रे-कुर्ला वसाहत उभारताना त्या भागाला लागून असणारी शासकीय वसाहतीची जमीन आता पहिल्या टप्प्यात विकासासाठी हाती घेतली जाईल.

०५. शासकीय वसाहतीची फेररचना करून तेथे उपलब्ध होणारी अतिरिक्त जमीन "कन्व्हेन्शन सेंटर"साठी वापरण्यात येणार आहे.

## बेनामी संपत्ती कायदा १ नोव्हेंबरपासून लागू होणार

०१. बेनामी व्यवहार रोखणारा नवा कायदा १ नोव्हेंबरपासून पूर्ण देशभरात लागू करण्यात येणार असून, यामुळे बेनामी संपत्ती तसेच व्यवहार करणाऱ्यांना ७ वर्षांपर्यंत तुरुंगवास आणि दंड होऊ शकतो.

०२. धार्मिक विश्वस्तांना या कायद्याच्या बाहेर ठेवण्याच्या केंद्रीय अर्थमंत्री अरुण जेटली यांच्या निर्णयानंतर काळ्या पैशाला प्रतिबंध घालण्यासाठी संसदेने ऑगस्टमध्ये बेनामी व्यवहार (प्रतिबंध) कायदा पारित केला केला आहे.

०३. बेनामी संपत्ती प्रतिबंध या नवीन कायद्यातील नियम आणि तरतुदींची अमंलबजावणी १ नोव्हेंबर २०१६ पासून करण्यात येणार आहे. हा कायदा लागू झाल्यानंतर १९८८ च्या बेनामी व्यवहार कायद्याचे नाव बदलणार असून, ते बेनामी संपत्ती व्यवहार प्रतिबंध कायदा,१९८८ असे होणार आहे.

०४. जुन्या कायद्यानुसार बेनामी व्यवहार केल्यास तीन वर्षांचा तुरुंगवास आणि दंड अशी शिक्षा देण्याची तरतूद होती. मात्र नवीन कायद्यामुळे सात वर्षांचा तुरुंगवास आणि दंडाची तरतूद करण्यात आली आहे.

०५. बेनामी संपत्ती आढळल्यास ती नुकसानभरपाई न देता जप्त करण्याचा अधिकार सरकारला देण्यात आला आहे. चर्च, गुरुद्वारा, मशीद तसेच मंदिरात मूळ संपत्ती असेल तर कलम ५८ अंतर्गत सरकारला ती मुक्त ठेवण्याचा अधिकार असल्याचे जेटली यांनी सांगितले.

## भारतात 'ज्युरासिक पार्क'ची निर्मिती

०१. अहमदाबादपासून साधारण ३० किलोमीटर अंतरावर 'ज्युरासिक पार्क'ची निर्मिती करण्यात आली आहे. तसेच येथे ठेवण्यात आलेली डायनॉसॉरची मॉडेल्स पर्यटकांसाठी आकर्षण ठरत आहे.

०२. राजकन्या आलिया सुलताना बाबी यांना जिवाश्म आणि प्राचिन अवशेषांमध्ये रुची आहे. जिवाश्म अभ्यासादरम्यान जवळच्या गावातील ग्रामस्थ मसाले कुटण्यासाठी डायनॉसॉरच्या अंड्याचा दगड म्हणून वापर करत असल्याचे आलिया यांच्या लक्षात आले.

०३. आता हे अंडे व इतर अवशेष त्यांच्या राजवाड्यातील संग्रहात ठेवण्यात आले असून, ते देखील पर्यटकांचे लक्ष वेधून घेत आहे. एकेकाळी आपल्या पूर्वजांनी जेथे राज्य केले होते तेथे मिळालेला हा अमुल्य साठा असल्याची भावना त्यांनी व्यक्त केली आहे.

०४. जेथे हे अंडे सापडले तेथेच आता या 'ज्यूरासिक पार्क'ची निर्मिती करण्यात आली आहे.

## गोव्याच्या पहिल्या महिला मुख्यमंत्री शशिकला काकोडकर यांचे निधन

०१. गोव्याच्या पहिल्या महिला मुख्यमंत्री शशिकला काकोडकर यांचे शुक्रवारी दीर्घ आजाराने निधन झाले. त्या ८१ वर्षांच्या होत्या.

०२. गोव्याचे पहिले मुख्यमंत्री दयानंद बांदोडकर यांच्या त्या कन्या होत्या. गोव्यातील महाराष्ट्रवादी गोमांतक पक्षाच्या प्रमुख नेत्या म्हणून शशिकला काकोडकर प्रसिद्ध होत्या.



०३. दयानंद बांदोडकर यांच्या निधनानंतर शशिकला काकोडकर यांनी १९७३ मध्ये गोव्याच्या मुख्यमंत्रीपदाची जबाबदारी सांभाळली. त्यानंतर एप्रिल १९७९ पर्यंत त्या गोव्याच्या मुख्यमंत्रीपदावर कार्यरत होत्या.

०४. गोव्यामध्ये प्राथमिक शिक्षणामध्ये मराठी शिकवणे बंधनकारक करण्यात शशिकला काकोडकर यांनी महत्त्वाची भूमिका निभावली होती.

०५. भारतीय भाषा सुरक्षा मंच या गोव्यातील संघटनेचे अध्यक्षपदा शशिकला काकोडकर यांच्याकडेच होते.